नागपूर, वर्धा व बुलडाणा या बँकांचा आढावा घेण्यासाठी राज्यस्तरीय अंमलबजावणी समिती गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्याग विभाग**
**शासन निर्णय क्र. बैठक-०६१४/प्र.क्र. ३७५/२-स**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दि. २१/५/२०१५

**वाचा :- १. शासन निर्णय क्र. बैठक-०६१४/प्र.क्र.३७५/२-स, दि. २७/३/२०१५ व दि. ३१/३/२०१५ .**

**प्रस्तावना - :**

नागपूर, वर्धा व बुलडाणा या जि.म.स. बँकांना केंद्र शासनाच्या योजनेतंर्गत दि. २७/३/२०१५ व दि. ३१/३/२०१५ च्या शासन निर्णयाद्वारे अनुक्रमे रु. २१२.०० कोटी व रु. ३७.९७ कोटी अर्थसहाय्य वितरित करण्यात आले आहे. या तिन्ही बँकांवर संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली प्राधिकृत अधिकाऱ्यांची समिती नियुक्त करण्यात आली आहे.

वरील बँकांना अर्थसहाय्य करण्याबाबत झालेल्या सामंजस्य करारानुसार बँकांनी आर्थिक व वित्तीय प्रगतीसाठी संनियंत्राणात्मक कृती आराखडा (MAP) तयार करुन राबविणे अपेक्षित आहे. या कृती आराखडयानुसार बँकांनी केलेल्या प्रगतीचा नियतकालीक आढावा राज्यस्तरीय अंमलबजावणी समितीमार्फत (State Level implementation committee) घेणे आवश्यक आहे. याबाबत सहकार आयुक्त व निबंधक यांनी शासनास प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार या बँकांचा नियतकालीक आढावा घेण्यासाठी राज्यस्तरीय अंमलबजावणी समितीमार्फत (State Level implementation committee) गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -:**

नागपूर, वर्धा व बुलडाणा या जि.म.स. बँकांना बँकींग परवाना मिळण्याकरीता अर्थसहाय्य देण्याबाबत केंद्र शासन, राज्य शासन व नाबार्ड यांच्यात झालेल्या सामंजस्य करारानुसार या बँकांनी तयार केलेल्या स्वनियंत्रणात्मक कृती आराखडयाचा आढावा घेण्यासाठी खालीलप्रमाणे राज्यस्तरीय अंमलबजावणी समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १. | मा. प्रधान सचिव (सहकार) | - | अध्यक्ष |
| २. | सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे | - | सदस्य |
| ३. | प्रादेशिक संचालक, भारतीय रिझर्व्ह बँक, नागपूर | - | विशेष निमंत्रित |
| ४. | मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड, प्रादेशिक कार्यालय, पुणे | - | विशेष निमंत्रित |
| ५. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या. मुंबई | - | सदस्य |
| ६. | अप्पर आयुक्त व विशेष निबंधक, सहकारी संस्था, पुणे | - | सदस्य सचिव |

वरील समितीने नागपूर, वर्धा व बुलडाणा या जि.म.स. बँकांच्या कामकाजाचा व आर्थिक प्रगतीचा दर तिमाहीला आढावा घेऊन या बँकांना मार्गदर्शन करावे. समितीचे सदस्य सचिव यांनी समितीच्या कामकाजाबाबत व या बँकांच्या आर्थिक प्रगतीबाबत शासनास वेळोवेळी अहवाल सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५२७१८२६१३३१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: CN = Santosh Arun Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Officer On Special Duty
Date: 2015.05.27 18:27:00 +05'30'

**(संतोष पाटील)**
**विशेष कार्य अधिकारी**

**प्रत -:**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. जिल्हाधिकारी, नागपूर /वर्धा / बुलडाणा.
३. प्रादेशिक संचालक, भारतीय रिझर्व्ह बँक, नागपूर.
४. मुख्य महाप्रबंधक, नाबार्ड, प्रादेशिक कार्यालय, पुणे.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.
६. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर / अमरावती.
७. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपू, वर्धा व बुलडाणा.

**प्रत माहितीसाठी -:**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.